**तपासणी नाक्याचे बळकटीकरण व तात्पुरत्या/कायमस्वरूपी चेकनाक्याचे अतिरिक्त कार्यक्रमासाठी योजनेसाठीचा सन २०१४-१५ साठी अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः टिआरएस-०६/२०१४/प्र.क्र.१२०/फ-६**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीख: ३१ जानेवारी, २०१५

वाचा :-

१) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.३५(१४-१५)/३५९, दिनांक ३.६.२०१४

२) शासन निर्णय समक्रमांक : दिनांक २०.६.२०१४ व दिनांक १५.७.२०१४

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.: अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दिनांक १.७.२०१४

४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.पुरक-२०१४/प्र.क्र.५८९/अर्थसंकल्प-३ दिनांक १.१.२०१५

**शासन निर्णय :-**

राज्य योजना-तपासणी नाक्याचे बळकटीकरण व तात्पुरत्या/कायमस्वरूपी चेकनाक्याचे अतिरिक्त कार्यक्रम या योजनेचा रु.६०.०० लक्ष एवढया रकमेचा सन २०१४-१५ चा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सादर केला होता. या रकमेमधून वन विभागातील तपासणी नाक्याचे बांधकामासाठीचा खर्च करण्यात येतो. याकरीता सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षासाठी रु.६०.०० लक्ष नियतव्यय निश्चित करण्यात आला होता. त्यापैकी रु.४२.०० लक्षची तरतुद अर्थसंकल्पित करण्यात आली होती.

वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ३ येथील दिनांक १.७.२०१४ च्या परिपत्रकानुसार अर्थसंकल्पीत रक्कम रु.४२.०० लक्ष रकमेच्या ६०% च्या मर्यादेत रु.२५.२ लक्ष इतका निधी वितरित व खर्च करण्यास उपरोक्त संदर्भ क्र. २ नुसार मान्यता देण्यात आली आहे.

आता वित्त विभागाचे संदर्भ क्रमांक ४ च्या परिपत्रकानुसार प्रस्तुत योजनेच्या उर्वरीत नियतव्यय अर्थसंकल्पीत करण्यात आला आलेला असल्याने संदर्भ क्र.३ येथील वित्त विभागाच्या परिपत्रकानुसार एकूण रु.६०.०० लक्षच्या ६०% प्रमाणे रु.३६.०० लक्ष इतकी रक्कम वितरीत करता येऊ शकते. त्यापैकी संदर्भ क्र.२ नुसार यापूर्वी रु.२५.२० लक्ष वितरीत करण्यात आलेले आहे. त्यामुळे उर्वरीत रक्कम रु.१०.८० लक्ष इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर योजनेवर होणारा खर्च -सी-७, प्रधानशीर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०१ वनीकरण १०१ (११) वनसंधारण व विकास, (११) (२७) कायमस्वरुपी २१९ चेकनाक्याचे बळकटीकरण व तात्पुरत्या/कायम स्वरुपी ४३१ चेकनाक्याची अतिरिक्त कार्यक्रमासाठी योजना (राज्य)(२४०६-२१४१)०

या लेखाशीर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दिनांक १.७.२०१४ च्या परिपत्रकान्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१३/२०१५/व्यय-१० दिनांक १४.१.२०१५ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०२१४५३१८०९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uvais Mohammed Farooqui

Digitally signed by Uvais Mohammed Farooqui
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uvais Mohammed Farooqui
Date: 2015.02.02 15:04:09 +05'30'

**(डॉ.यु.एम.फारुकी)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक),
५. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
६. महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
७. जिल्हा कोषागार अधिकारी- अमरावती, गडचिरोली, नागपूर, चंद्रपूर, औरंगाबाद, पुणे, कोल्हापूर, नाशिक, ठाणे, यवतमाळ.
८. कार्यासन अधिकारी, ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांना विनंती करण्यात येते की, नमूद शासन निर्णयानुसार रक्कम वितरित करण्यात यावी.
९. नियोजन विभाग (कार्यासन -१४७५)मंत्रालय, मुंबई- ३२.
१०. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०/अर्थ-६, मंत्रालय, मुंबई-३२.
११. कार्यासन अधिकारी फ-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. फ-६, कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.